अर्थसंकल्पिय अनुदान सन २०२१-२२
“ २२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१) ” मागणी क्रमांक वाय-२

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र. ६४/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख: १४ जानेवारी, २०२२

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ६ एप्रिल, २०२१
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.१५.४.२०२१
३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.१२.५.२०२१
४. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.४.६.२०२१
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः संकीर्ण-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून, २०२१
६. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.२८.६.२०२१
७. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.१६.७.२०२१
८. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.१८.८.२०२१
९. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.२१.९.२०२१
१०. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.३०.९.२०२१
११. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.२०.१०.२०२१
१२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.२९.१०.२०२१
१३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दि.१५.१२.२०२१

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वेतनभत्ते खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८८१)” या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२१-२२ करिता ३६,सहायक अनुदाने (वेतन) खर्चासाठी एकूण रुपये १८४.१०८१ कोटी इतका निधी वाचा मधील अनुक्रमांक २, ३, ४, ६, ७, ८, ९, ११, १२ व १३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

तसेच ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) खर्चासाठी एकूण रुपये ३९३.५० लाख इतका निधी वाचा मधील अनुक्रमांक ६, ७, १०, ११ व १३ च्या शासन निर्णयान्वये संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आला असून, आता जिल्हा परिषदांचा एकूण वेतनखर्च व मागणी विचारात घेऊन संबंधित जिल्हा परिषदांना वेतननिधी तसेच विहित अटी व शर्तींची पूर्तता करणा-या जिल्हा परिषदांना वेतनेतर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)" या लेखाशिर्षाखाली ३६, सहायक अनुदाने (वेतन) साठी रुपये १०,१५,००,०००/- व ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रुपये ५५,००,०००/- असे एकूण रुपये १०,७०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी सत्तर लाख फक्त) इतके अनुदान या शासन निर्णयासोबतच्या "विवरणपत्र अ" मध्ये दर्शविल्यानुसार संबंधित मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांना मंजूर वितरीत करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत सन २०२०-२१ चा अखर्चित निधी शासनास जमा करण्याच्या अधीन सदर निधी वितरीत करण्यात येत असून, अखर्चित निधी शासनास जमा केल्याशिवाय निधी कोषागारातून आहरित करण्यात येऊ नये. वेतनेतर निधी संबंधित जिल्हा परिषदांनी प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, भाडेपट्टी, मोटरवाहन, विद्युत देयके, पेट्रोल/ तेल/वंगण इत्यादी बाबींसाठी आवश्यकतेनुसार वापरावा.

३. या शासन निर्णयामध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

४. वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तींचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांची राहील. तसेच

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.६.२०२१ च्या परिपत्रकातील सूचनांप्रमाणे खर्चामध्ये काटकसर होईल, याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

६. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने, (०१)(०५) नियमित आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८८१)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७३/व्यय-३, दिनांक ३०.११.२०२१ अन्वये वेतनेतर निधी खर्चास प्राप्त सहमतीनुसार तसेच वेतननिधी संदर्भात प्रशासकिय विभागांना दिलेल्या अधिकारात व वित्त विभागाने बिम्स प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११४११०१३११२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2022.01.14 12:22:56 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व

२. विभागीय आयुक्त, सर्व
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१२. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८)
१३. कक्ष अधिकारी, ग्राम विकास विभाग
१४. कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१५. निवड नस्ती कार्यासन पापु-२३

विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक बजेट-१४२१/प्र.क्र.६४/पापु-२३, दिनांक १४ जानेवारी, २०२२ सोबतचे सहपत्र

| मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने(स्थानिक क्षेत्र) (०१) (०५) नियमित आस्थापना (२२१५१८८१)" | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अ. क्र. | जिल्ह्याचे नांव | सन २०२१-२२ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारे अनुदान | | | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५१८८१ खाली वितरीत करण्यात येत असलेले एकूण अनुदान (अक्षरी रुपये) |
| | | ३६, सहायक अनुदाने (वेतन) | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | वितरीत करण्यात येत असलेली रक्कम (३+४) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | पालघर | ० | १०००००० | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| २ | रायगड | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| ३ | रत्नागिरी | ७५००००० | ० | ७५००००० | रूपये पंच्याहत्तर लाख फक्त |
| ४ | सिंधुदुर्ग | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| ५ | जळगांव | ५०००००० | ० | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| ६ | अहमदनगर | १०००००००० | ० | १०००००००० | रूपये एक कोटी फक्त |
| ७ | पुणे | ५०००००० | ० | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| ८ | सातारा | १०००००००० | ० | १०००००००० | रूपये एक कोटी फक्त |
| ९ | सांगली | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| १० | सोलापूर | ५०००००० | ० | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| ११ | कोल्हापूर | १४०००००० | ० | १४०००००० | रूपये एक कोटी चाळीस लाख फक्त |
| १२ | जालना | ५०००००० | ० | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| १३ | परभणी | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| १४ | बीड | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| १५ | नांदेड | १०००००००० | ० | १०००००००० | रूपये एक कोटी फक्त |
| १६ | उस्मानाबाद | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| १७ | लातूर | ५०००००० | ० | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| १८ | बुलढाणा | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| १९ | यवतमाळ | ० | १५००००० | १५००००० | रूपये पंधरा लाख फक्त |
| २० | नागपूर | ५०००००० | ० | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| २१ | भंडारा | ० | १०००००० | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| २२ | गोंदिया | ० | १०००००० | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| २३ | चंद्रपूर | २५००००० | ० | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| २४ | गडचिरोली | ० | १०००००० | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| एकूण | | १०१५०००००० | ५५००००० | १०७०००००० | रूपये दहा कोटी सत्तर लाख फक्त |

BALASAHEB BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2022.01.14 12:23:41 +05'30'

(बाळासाहेब बा. हजारे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन